सन २०१८-१९ या वित्तिय वर्षात रुग्णालय तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरित करणेबाबत..

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः कुनिका २०१८/प्र क्र २७०/आरोग्य -५
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ८ व १० वा मजला
दिनांक: १९नोव्हेंबर,२०१८.

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग ,शासन निर्णय क्रमांकः, कुनिका २०११/प्र क्र ३२१/आरोग्य-५, दिनांक २१ मार्च, २०१२

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७.

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८.

४) ४) सह संचालक, आरोग्य सेवा, (कुष्ठ व क्षय), पुणे यांचे क्र. ससंआसे/कुष्ठ व क्षय/कक्ष १०२/रुग्णालय तत्व अनुदान प्रस्ताव/११२१९-२१/२०१८, दिनांक १०.०८.२०१८

५) ५) सह संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, यांचे शिफारस पत्र क्र.संआसे /सन २०१७-१८/वित्तीय वर्षातील /रुग्णालय तत्वावर स्वयंसेवी / अनुदान/कक्ष-१८/५६०९-१०/२०१८, दि.२९.१०.२०१८.

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयानुसार रुग्णालय तत्त्वावरील कुष्ठरुग्णांसाठी रु.२,२००/- प्रमाणे प्रतीरुग्ण व दरमहा संस्थेने प्रत्यक्ष भरती केलेल्या रुग्णांप्रमाणे अनुदान देण्यात येते. याकरीता सन २०१८-१९ या वित्तिय वर्षातील तरतूदीमधील रुग्णालय तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

रुग्णालय तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदाने देण्यासाठी ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.३,००,००,०००/-(तीन कोटी) इतके सहायक अनुदान (योजनेतर) सन २०१८-१९ या वर्षाकरीता अर्थसंकल्पित करण्यात आले आहे. सदर अनुदानातून खाली दर्शविल्याप्रमाणे

स्वयंसेवी संस्थांना **रु.१,०१,७०,०३३/- (रु.एक कोटी एक लाख सत्तर हजार तेहत्तीस फक्त )** इतके सहायक अनुदान दिनांक २१ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयातील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | संस्थेचे नाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | देय अनुदान |
|---|---|---|---|---|
| १. | महारोगी सेवा समिती आनंदवन वरोरा जि चंद्रपुर | जुलै,२०१७ ते सप्टेंबर २०१७ | १८०० | ३९६००००/- |
| २. | कुष्ठरोग दवाखाना, वडोली,ता.तलासरी, जि.ठाणे | एप्रिल,२०१७ ते जुन २०१८ | ५८५ | १२४२८८०/- |
| ३. | महारोगी सेवा समिती दत्तपूर जि वर्धा | एप्रिल,२०१७ ते मार्च २०१८ | ६७१ | १४१०९०८/- |
| ४. | कुष्ठरोग निवारण समिती शातीवन, नेरे, जि.रायगड | एप्रिल,२०१७ ते मार्च २०१८ | ३०२ | ५३१६५६/- |
| ५. | महात्मा गांधी शिक्षण संस्था चावर्दा, जि.बुलढाणा | एप्रिल,२०१७ ते मार्च २०१८ | १८० | ३९६०००/- |
| ६. | दि लेप्रसी मिशन कोठारा लेप्रसी हॉस्पिटल, ता. अचलपूर जि.अमरावती | जुलै,२०१७ ते डिसेंबर,२०१७ | ४४९ | ५०३८५२/- |
| ७. | विदर्भ महारोगी सेवा मंडळ, तपोवन, जि.अमरावती | जुलै,२०१७ ते डिसेंबर,२०१७ | ८६८ | १८८१३२६/- |
| ८. | लेप्रसी ॲण्ड रिहॅबिलीटेशन सेंटर निंभोरा, जि.अमरावती | जुलै,२०१७ ते डिसेंबर,२०१७ | ११९ | २४३४११/- |
| | एकूण | | | १०१७००३३/- |

३. सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात रुग्णालयीन तत्त्वावर स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरणाचा प्रस्ताव, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०१७ निधी वितरणाबाबत वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७ सोबतच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.८ समोर नमूद तपासणी सूचीनुसार तपासला असून मुद्दा क्र.३ ते ९ मधील सर्व अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर शासन परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील सर्व अटींची पूर्तता होत आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक, दि.०२ एप्रिल, २०१८ अन्वये दिलेल्या सुचनांनुसार, सन २०१७-१८ या वित्तिय वर्षात रुग्णालयीन तत्त्वावर स्वयंसेवी संस्थांना यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने

लेखापरिक्षण /महालेखापाल यांचे गंभीर आक्षेप नाहीत. या योजनेंतर्गतचा निधी लाभार्थ्यांच्या थेट खात्यात जमा होत नाही. सदर योजनेंतर्गत वस्तू खरेदी प्रस्तावात खरेदी नियोजन करण्यात येते व आवश्यकतेनुसार दरकरारावर खरेदी करण्यात येते. तसेच भांडवली वस्तूंच्या खरेदीनंतर डेड स्टॉक रजिस्टरमध्ये नोंद घेण्यात येते. सदर योजनेच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४. सहसंचालक (कुष्ठ व क्षय), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले असून त्यांनी वरील अटी पुर्ण केल्याची खातरजमा करुन संबंधित अनुदान अदा करण्याची कार्यवाही करावी. तसेच सदर अनुदानाशी संबंधित देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करणेसाठी सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च करु नये व खर्चाचा ताळमेळ घालून अहवाल तसेच उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

५. याबाबतचा खर्च मागणी क्र.आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य उपशिर्ष (०१)(१२) कुष्ठरोग्यांसाठी सहायक अनुदाने (२२१००६८३), मुळ अनुदान या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालू वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७ अन्वये त्या विभागाने प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201811191151066017 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Balkrishna Sadikale

Digitally signed by Ashok Balkrishna Sadikale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8bf4abca9cffe245f125a15e04c0484588caf62e835869fb4d6f50064ebdcd69, serialNumber=fabaff613511cd50155bfbc69dd29512e15f759a310be8ca8cb9522ad27ed9b9, cn=Ashok Balkrishna Sadikale
Date: 2018.11.19 12:24:17 +05'30'

अ.बा.सादिकले)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१)महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखावअनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई.

२)जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

४)निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

५)संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

६)सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे

७)सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.

८)वित्तविभाग, (व्यय.१३) मंत्रालय, मुंबई.

९)सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई

१०)निवडनस्ती (आरोग्य-५)